**महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनीस एकलहरे जि.नाशिक येथे कोळशावर आधारीत प्रस्तावित १ X ६६० मे.वॅ.,युनिट-६ सुपर क्रिटीकल औष्णिक विद्युत प्रकल्प उभारण्यास तसेच कर्ज व भाग भांडवलास शासनाची मान्यता.**

## महाराष्ट्र शासन

उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,
शासन निर्णय क्रमांक:प्रकल्प २०११/प्र.क्र.३१३/ऊर्जा-४
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २९ डिसेंबर, २०११

**प्रस्तावना :** महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनीच्या सध्याच्या स्थापित क्षमतेपेक्षा राज्याची विजेची मागणी जास्त असल्यामुळे राज्यात सुमारे ५००० मे.वॅ. विजेची तूट भासत आहे. सदर तूट कमी करण्याच्या दृष्टीने सन २०१४ अखेर वीज निर्मिती क्षमता ५४९० मे.वॅ. ने वाढविण्याचा महानिर्मिती कंपनीचा मानस आहे. त्यादृष्टीने एकलहरे जि.नाशिक येथे कोळशावर आधारीत १ x६६० मे.वॅ. क्षमतेचा युनिट-६ सुपर क्रिटीकल औष्णिक विद्युत प्रकल्प उभारण्यास त्याचप्रमाणे कर्ज व भाग भांडवलास मान्यता देण्याचा प्रस्ताव महानिर्मिती कंपनीने शासनाच्या मान्यतेसाठी सादर केला होता.

**शासन निर्णय :** राज्यातील विजेची वाढती मागणी व भविष्यातील विजेची गरज विचारात घेऊन शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतले आहेत :-

(१) महानिर्मिती कंपनीने एकलहरे जि.नाशिक येथे कोळशावर आधारीत १ x६६० मे.वॅ. युनिट-६ या अंदाजित किंमत रु.४३९० कोटीच्या सुपर क्रिटीकल प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यास शासन मान्यता देण्यात आली.

(२) सदर प्रकल्प उभारण्यासाठी येणाऱ्या एकूण अंदाजित खर्चाच्या ८०% रक्कम (रु.३५१२ कोटी) पीएफसी / आरईसी किंवा इतर वित्तीय संस्थांकडून कर्जरुपाने महानिर्मितीने उपलब्ध करुन घेण्यास मान्यता देण्यात आली.

(३) वरील प्रकल्प किंमतीपैकी २०% इतकी रक्कम (रु.८७८ कोटी) राज्य शासनाचे भागभांडवल म्हणून टप्प्या-टप्प्याने महानिर्मिती कंपनीस राज्याच्या वार्षिक नियोजनातून उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात आली.

(४) प्रकल्पाच्या उभारणीकरीता आंतरराष्ट्रीय स्पर्धात्मक निविदा प्रक्रियेचा अवलंब करण्यास मान्यता देण्यात आली.

(५) सदर प्रकल्पाचा सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) तयार झाल्यानंतर आता दर्शविलेली किंमत व सविस्तर प्रकल्प अहवालाप्रमाणे येणारी किंमत यामध्ये १०% Variation झाल्यास त्यास परत मंत्रिमंडळाची मान्यता घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौ.संदर्भ क्रमांक ४०८/११ दिनांक २१.१२.२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१११२२९१२०३४५१२४५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( कुंदा आ.रेठरेकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,
मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा.उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा.मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिवांचे स्वीय सहाय्यक,
प्रधान सचिव (वित्त),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई ४०० ०२०
महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई ४०० ०२०
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
महालेखापाल (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई४०० ०५१
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

निवासी लेखा अधिकारी,मुंबई
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, सुत्रधार कंपनी मर्यादित,मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादित,मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित,मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्यादित,मुंबई
कार्यासन (व्यय-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन (१४८३), नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई
ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती (ऊर्जा-४) .